**महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर यांच्या नियंत्रणाखालील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक मपवि २०१३/प्र.क्र. १९/म्हापसू**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
दिनांक :- २८ सप्टेंबर, २०१८

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एसआरव्ही १०९५/प्र.क्र.१/९५/बारा, दिनांक ८ जून, १९९५

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एसआरव्ही१०९५/प्र.क्र.३३/९५/बारा, दिनांक १ नोव्हेंबर, १९९५

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एसआरव्ही१०९६/प्र.क्र.३३/९५/बारा, दिनांक २० मार्च, १९९७

४) शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्रमांक अेजीयु ११९५/सीआर १००/१८-अे, दिनांक २१ सप्टेंबर, १९९९

५) शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्रमांक कृषिवि २००१/ प्र.क्र. ८४/२० अे, दिनांक २ जुलै, २००१

६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-वेतन ११९९/प्र.क्र.२/९९/सेवा-३, दि.२० जुलै, २००१

७) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक, वेतन ११०९/प्र.क्र.४३/सेवा-३, दि. ३१ ऑगस्ट, २००९

८) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:वेतन ११०९/प्र.क्र.१/०९/सेवा-३, दि.१५ आक्टोबर, २००९

९) शासन शुद्धीपत्रक वित्त विभाग, क्रमांक:वेतन ११०९/प्र.क्र.१/सेवा-३, दिनांक २१ मे २०१०

१०) शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्रमांक मपवि २००९/ प्र.क्र. ४४४/०९/पदुम -१ (अ), दिनांक ६ जुलै, २०१०.

११) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक याचिका-१०१२/प्र.क्र.७४/सेवा ३, दि. ३ मार्च, २०१६

<u>**प्रस्तावना :**</u>

राज्य शासनाच्या कर्मचाऱ्यांना पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नसल्याने असलेली कुंठीतता घालविण्याकरीता संदर्भाधीन अ.क्र. १ येथील दिनांक ८ जून, १९९५ च्या शासन निर्णयान्वये कालबध्द पदोन्नती योजना लागू करण्यात आली.

२. त्याच धर्तीवर कृषी विद्यापीठे, संलग्न कृषी महाविद्यालये, कृषी विद्यालये, ग्रामीण शिक्षण संस्था येथील गट "क" व "ड" (वर्ग ३ व ४) मधील कर्मचाऱ्यांना पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नसल्याने असलेली कुंठीतता घालविण्याकरीता संदर्भाधीन अ.क्र. ४ येथील दिनांक २१ सप्टेंबर, १९९९ च्या शासन निर्णया अन्वये कालबध्द पदोन्नती योजना लागू करण्यात आली आहे. सदर योजनेनुसार कृषि विद्यापीठातील तत्कालीन पशुवैद्यकीय, दुग्धतंत्रज्ञान, मत्स्य विज्ञान महाविद्यालय व पशुपैदास प्रक्षेत्रे येथील पात्र असलेल्या कर्मचाऱ्यांना लाभ देण्यात आले होते.

३. दरम्यान, शासनाने सन २००० मध्ये महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाची नागपूर येथे स्थापना करुन संदर्भाधीन अ.क्र. ५ येथील दिनांक २ जुलै, २००१ च्या शासन निर्णयान्वये कृषि विद्यापीठातील तत्कालीन पशुवैद्यकीय, दुग्धतंत्रज्ञान व मत्स्य विज्ञान महाविद्यालये व प्रक्षेत्रे आणि येथील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी पदांसह महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाकडे वर्ग करण्यात आले आहे.

४. संदर्भाकीत अनु. क्र ६ येथील दिनांक २० जुलै २००१ च्या शासन निर्णयान्वये राज्य शासकीय व जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांना लागू असलेली कालबध्द पदोन्नती योजना बंद करुन त्याऐवजी **सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना** लागू केलेली आहे. तथापि, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाच्या नियंत्रणाखालील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना विद्यापीठ स्थापने पासून यापूर्वीची कालबध्द पदोन्नती योजना वा नंतरची सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करण्याबाबतचे कोणतेही आदेश अथवा शासन निर्णय निर्गमीत न झाल्याने सदर योजनेचा लाभ पात्र कर्मचाऱ्याना देण्यात अडचणी निर्माण झाल्या होत्या.

५. वर नमूद केल्याप्रमाणे आता, संदर्भाधीन अ.क्र. ६ येथील दिनांक २० जूलै, २००१ च्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आलेली **सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना** महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाच्या नियंत्रणाखालील शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावास दिनांक ०७ ऑगस्ट २०१८ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीमध्ये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

६. संदर्भाधीन अनु. क्र ६ येथील दिनांक २० जुलै, २००१ च्या शासन निर्णयान्वये शासकीय कर्मचाऱ्यांना लागू केलेली "**सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना**" महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाच्या नियंत्रणाखालील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून लागू करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(१) ही योजना रु.८०००-१३५०० व त्याहून कमी वेतनश्रेणीत वेतन घेणाऱ्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांना लागू राहील.

(२) या योजनेचा लाभ संबंधीत पदावरील १२ वर्षाच्या नियमीत सेवेनतंरच अनुज्ञेय होईल.

(३) सेवेत दोन किंवा त्याहून अधिक वेळा पदोन्नती मिळालेल्या कर्मचाऱ्यांना या योजनाचा लाभ अनुज्ञेय होणार नाही.

(४) या योजनेअंतर्गत पदोन्नतीच्या पदाची वेतनश्रेणी देय होईल. जेथे पदोन्नतीचे पद उपलब्ध नाही तेथे तसेच एकाकी (Isolated) पदावरील कर्मचाऱ्यांना वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २०/०७/२००१ सोबतच्या परिशिष्ट - एक मधील वेतनश्रेणी देय होईल.

(५) दिनांक १ जानेवारी, २००६ रोजी अथवा त्यानंतर सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ मिळालेल्या/मिळणाऱ्या कर्मचाऱ्यांची सुधारित वेतन संरचनेत वेतननिश्चिती ही वित्त विभागाच्या दिनांक ३१ ऑगस्ट २००९ च्या शासन निर्णयानुसार करण्यात येईल.

(६) या योजनेअंतर्गत पदोन्नतीच्या पदाची वेतनश्रेणी देय ठरविली असल्याने, वरिष्ठ वेतनश्रेणी मिळण्यासाठी पदोन्नतीच्या पदाकरिता विहीत केलेली अर्हता, पात्रता, ज्येष्ठता, अर्हता परीक्षा, विभागीय परीक्षा या सर्व बाबींची पूर्तता करणे तसेच पदोन्नतीची कार्यपध्दती अनुसरणे, आवश्यक राहील. जेथे दिनांक २०/०७/२००१ रोजीच्या शासन निर्णया सोबत जोडलेल्या प्रमाणे परिशिष्टातील वेतनश्रेणी मंजूर करण्यांत येईल, तेथे गोपनीय अहवालाच्या आधारे पात्रता तपासण्यात यावी.

(७) या योजनेचा लाभ संपूर्ण सेवेत फक्त एकवेळ अनुज्ञेय राहील. ज्या कर्मचाऱ्याना दिनांक ८ जून १९९५ च्या म्हणजे संदर्भ क्र ४ येथील दिनांक २१/०९/१९९९ च्या शासन निर्णयान्वये यापुर्वीच वरिष्ठ वेतनश्रेणीचा लाभ मिळाला असेल त्यांना या योजनेअंतर्गत पुन्हा वरिष्ठ वेतनश्रेणीचा लाभ अनुज्ञेय होणार नाही.

(८) या योजनेअंतर्गत वरिष्ठ वेतनश्रेणी दिल्यावर, वेतन निश्चिती नियमीत पदोन्नती प्रमाणेच होईल. मात्र, त्याच वेतनश्रेणीत नियमीत/ कार्यात्मक पदोन्नती मिळाल्यावर पुन्हा वेतननिश्चितीचा लाभ देय होणार नाही.

(९) नियमीत पदोन्नती नाकारलेल्या तसेच नियमीत पदोन्नतीस अपात्र ठरलेल्या कर्मचाऱ्यांना या योजनेचा लाभ देय होणार नाही. या योजनेअंतर्गत वरिष्ठ वेतनश्रेणी दिल्यानंतर नियमीत पदोन्नती नाकारलेल्या वा नियमीत पदोन्नतीस अपात्र ठरलेल्या कर्मचाऱ्यांना देण्यांत आलेला लाभ काढून घेण्यात येईल. मात्र दिलेल्या लाभांची वसूली करण्यात येणार नाही.

७. या योजनेसंबंधीची अन्य मार्गदर्शक तत्वे वाचा येथील अनुक्रमांक (१) ते (३) व अनुक्रमांक (५) ते (११) मध्ये नमुद आदेशांव्दारे विहित केल्याप्रमाणे राहतील.

८. ज्या पात्र कर्मचाऱ्यांना यापूर्वी महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाच्या निर्मीतीनंतर (०१/०८/२००१ वा त्या नंतर ) कृषि विभागाच्या दिनांक २१ सप्टेंबर १९९९ च्या शासन निर्णयानुसार कालबध्द पदोन्नतीचा लाभ मंजुर केला असेल ते आदेश रद्द करावेत. तसेच अशा कर्मचाऱ्यांना या आदेशानुसार, सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ मंजुर करुन, हयापूर्वी त्यांना मंजुर करुन अदा केलेली कालबध्द पदोन्नतीच्या लाभाची रक्कम, सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेव्दारे अनुज्ञेय ठरणाऱ्या लाभाशी समायोजित करुन, फरकाची रक्कम त्यांना अदा करावी. तसेच जे कर्मचारी महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ स्थापनेपूर्वीच (सन २००० पूर्वीच) कालबध्द पदोन्नतीस पात्र ठरुन त्यांना सदर लाभ यापूर्वी दिला गेला असल्यास, त्यांना पुन्हा सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजने अंतर्गत लाभ अनुज्ञेय राहणार नाही.

९. ही योजना दिनांक १ ऑगस्ट, २००१ पासून अंमलात येईल. या योजनेत पात्र लाभार्थींची थकबाकी बाबतची प्रत्यक्ष गणना करण्यात यावी व लाभार्थींना अदा करण्याची रक्कम नियमित अर्थसंकल्पीय तरतुदीतून अदा करण्यात यावी.

१०. हे आदेश दिनांक ०७ ऑगस्ट २०१८ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीमध्ये दिलेल्या मान्यता व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ६३०/१६/सेवा -३, दिनांक २९/११/२०१६, क्र ३८३/२०१८/ सेवा-३, दिनांक ०५/०९/२०१८ व क्र ५०५/२०१८/व्यय-२, दिनांक २५/०९/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२८१२५७०४९३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vikas Tulshiram Kadam

Digitally signed by Vikas Tulshiram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, cn=Vikas Tulshiram Kadam
Date: 2018.09.28 13:02:41 +05'30'

**( विकास तु. कदम )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१ मा. कुलपती व राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२ मा. कुलगुरु, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर
३ आयुक्त (पशुसंवर्धन), महाराष्ट्र राज्य, पुणे
४ कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर
५ प्रादेशिक सहआयुक्त, पशुसंवर्धन, नागपूर विभाग, नागपूर
६ नियंत्रक, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर
७ जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
८ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२ , मुंबई /नागपूर
९ महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२ , मुंबई /नागपूर
१० वित्त विभाग (सेवा ३)
११ निवड नस्ती